बधिरीकरण तज्ञ संवर्गातील अधिकारी यांच्या बदलीने पदस्थापनेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदस्था-२०२३/प्र.क्र.१३०/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : ३० मे, २०२३

**वाचा**:- शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग, दि.२३.०७.२०२०

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) (दोन), ४ (५) आणि कलम ६ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने विशेषज्ञ मधील बधिरीकरण तज्ञ संवर्गातील (वेतनस्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) अधिकाऱ्याची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.:-

| क्र | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | डॉ. भरत प्रभूदास गोहिल,<br>वैद्यकीय अधिकारी, बधिरीकरण तज्ञ, स्त्री रूग्णालय, अमरावती | वैद्यकीय अधीक्षक, ग्रामीण रूग्णालय, सोनगीर, जि.धुळे (रिक्त पदी) (तात्पुरता संवर्ग बदल) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. डॉ. भरत प्रभूदास गोहिल, वैद्यकीय अधिकारी, बधिरीकरण तज्ञ यांची तात्पुरता संवर्ग बदलून जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गात बदली करण्यात आलेली असल्याने त्यांची सेवाज्येष्ठता विशेषज्ञ संवर्गातच गृहित धरली जाईल.

४. डॉ. भरत प्रभूदास गोहिल यांची त्यांच्या विनंती अर्जानुसार बदली करण्यात आलेली असल्याने त्यांना म.ना.से (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन........) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

५. बदली झालेला अधिकारी त्याच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५३०१६४६५५९५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2023.05.30 17:50:43 +05'30'

(चंद्रकांत ह. वडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा (१/२), मुंबई/पुणे.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४) उप संचालक, आरोग्य सेवा, अकोला/नाशिक मंडळ.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र -१ , मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१ , मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/धुळे.
८) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
९) अपर मुख्य सचिव/सचिव-२, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१२) निवड नस्ती (सेवा - २)